वस्तू व सेवा कर अधिनियम-२०१७ मुळे कामांच्या कंत्राटांवर होणारा परिणाम व याबाबत करावयाच्या कार्यवाही संदर्भात मार्गदर्शक सूचना....

## महाराष्ट्र शासन

### जलसंपदा विभाग

**शासन परिपत्रक क्रमांक :- टीडीएस-०९१८/(प्र.क्र. ५९०/१८)/मोप्र-१**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १३ नोव्हेंबर, २०१८.

## प रि प त्र क

पहावे:-

१) शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांक जीएसटी- १०१७/ प्र.क्र. ८१/कराधान-१ दिनांक १९/०८/२०१७.
२) शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांक जीएसटी- १०१७/ प्र.क्र. १५५/कराधान-१ दिनांक ११/०९/२०१७.
३) शासन परिपत्रक सार्वजनिक बांधकाम विभाग क्रमांक संकीर्ण- २०१७/ प्र.क्र.१२१(भाग-२)/ इमारती-२ दिनांक १९/०९/२०१७.
४) शासन परिपत्रक सार्वजनिक बांधकाम विभाग क्रमांक संकीर्ण- २०१७/ प्र.क्र.१२१(भाग-२)/ इमारती-२ दिनांक २३/१०/२०१७.
५) शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांक संकीर्ण- २०१८/ प्र.क्र. १४४/२०१८/कोषा प्रशा-५ दिनांक २८/०९/२०१८.

प्रस्तावना:-

महाराष्ट्र शासन, वित्त विभागाच्या अधिसूचनेद्वारे दिनांक ०१/०७/२०१७ पासून राज्यात वस्तू व सेवा कर लागू करण्यात आला आहे. वस्तू व सेवा कराची चालू व नवीन कामांच्या कंत्राटांच्या बाबतीत कशा प्रकारे अंमलबजावणी करावी, याबाबत वित्त विभागाने संदर्भ क्र. १ व २ च्या परिपत्रकान्वये तर सार्वजनिक बांधकाम विभागाने संदर्भ क्र. ३ व ४ च्या परिपत्रकान्वये स्पष्टीकरणे प्रसिद्ध केली आहेत. यास अनुसरुन जलसंपदा विभागाच्या चालू व नवीन कामांच्या कंत्राटांच्या बाबतीत देखील स्वतंत्र सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन परिपत्रक :-

जलसंपदा विभागाच्या चालू व नवीन कामांच्या कंत्राटांच्या बाबतीत वस्तू व सेवा कराच्या अंमलबजावणी बाबत खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

**१. नवीन कामांच्या कंत्राटांच्या बाबतीत अवलंबिण्याची कार्यपद्धती:**

यापुढे नवीन कामांसाठी अंदाजपत्रके तयार करुन निविदा स्वीकृतीची कार्यवाही करतांना सार्वजनिक बांधकाम विभागाने संदर्भीय परिपत्रक क्रमांक ३ अन्वये प्रसिद्ध केलेल्या स्पष्टीकरणांनुसार खालीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

**१.१.** दरसूचीतील विविध बाबींचे दर हे वस्तू व सेवा कर वगळून असावेत. अंदाजपत्रके तयार करतांना प्रचलित वस्तू व सेवा कराचा परतावा देण्यासाठी Recapulation Sheet मध्ये त्यांचा समावेश करावा.

**१.२.** कामांच्या निविदा वस्तू व सेवा कर वगळून अंदाजपत्रकाच्या किंमतीवर आधारित मागविण्यात याव्यात.

**१.३.** कंत्राटदाराने वस्तू व सेवा कर भरणा केल्याच्या पुष्ठ्यर्थ परिपूर्ण प्रमाणित कागदपत्रे सादर केल्यानंतर कार्यकारी अभियंत्यांनी विभागीय लेखापालामार्फत पडताळणी करून अनुज्ञेय वस्तू व सेवा कराचा परतावा प्रस्ताव प्राप्त झालेल्या दिनांकापासून तीस दिवसाच्या आत अदा करावा.

**२. दिनांक ०१/०७/२०१७ पूर्वी कामाचे आदेश देण्यात आलेल्या कंत्राटांच्या बाबतीत अंमलबजावणीची कार्यपद्धती:**

वस्तु व सेवा कर हा आता अस्तित्वातील सर्व कंत्राटास लागू करण्यात आला असल्याने दि.०१/०७/२०१७ रोजी अस्तित्वातील कंत्राटासाठी कंत्राट शर्तीनुसार विक्री कर /मूल्यवर्धित कर / अबकारी कर/ एल. बी टी. / जकात इत्यादीचा समावेश निविदा दरातच असल्याने याबाबत आवश्यक वजावटी करुन कंत्राटदाराने वस्तू व सेवा कर शासनास भरणा केल्याबाबत अधिकृत दस्तऐवज/ कागदपत्रे सादर केल्यानंतर विधिवत परिगणना करुन विभागामार्फत परतावा देणे किंवा वसुली बाबतची कार्यवाही करावी. अशा प्रस्तावांची व कागदपत्रांची छाननी विभागीय लेखापाल, यांनी करावी व कार्यकारी अभियंता यांची मान्यता घ्यावी.

**३. दिनांक ०१/०७/२०१७ नंतर निश्चित केलेल्या परंतु या परिपत्रकातील परिच्छेद क्र. १ नुसार कार्यपद्धती न अवलंबता कामाचे आदेश देण्यात आलेल्या कंत्राटांच्या बाबतीत अंमलबजावणीची कार्यपद्धती:**

**३.१.** संदर्भ क्र. २ च्या वित्त विभागाच्या परिपत्रकातील, परिच्छेद १ मधील सूचनांनुसार निविदा सादर करतांना दिनांक १ जुलै २०१७ नंतर लागू झालेल्या वस्तू व सेवा कराच्या वित्तीय भाराचा विचार करुनच निविदा सादर करण्याबाबतचे कलम निविदेत समाविष्ट असेल तर कंत्राटदाराच्या देकारातच वस्तू व सेवा कर अंतर्भूत असल्याने कंत्राट शर्तीनुशार त्याचा कोणताही परतावा अनुज्ञेय होणार नाही.

**३.२.** संदर्भ क्र. २ च्या वित्त विभागाच्या परिपत्रकातील, परिच्छेद १ मधील सूचनांनुसार निविदा सादर करतांना दिनांक १ जुलै २०१७ नंतर लागू झालेल्या वस्तू व सेवा कराच्या वित्तीय भाराचा विचार करुन निविदा सादर करण्याबाबत कंत्राटदारास सूचना देण्यात आली नसेल व त्याबाबतचे कलम निविदेत समाविष्ट नसेल तर वरील परिपत्रकातील परिच्छेद २ प्रमाणे परतावा/वसुली बाबत कार्यवाही करावी.

## ४. करपात्र वस्तू/ सेवा अथवा दोन्हीसाठी सर्व पुरवठादार /कंत्राटदार यांच्या देयकांच्या प्रदानातून उद्‌गम कर वजावट (TDS) करणेबाबत:

संदर्भ क्र. ५ च्या वित्त विभागाच्या परिपत्रकातील सूचनांनुसार करपात्र वस्तू/ सेवा अथवा दोन्हीसाठी सर्व पुरवठादार / कंत्राटदार यांच्या देयकांच्या प्रदानातून न चुकता २% उद्‌गम कर वजावट (TDS) करण्यात यावा. याबाबत शासनाचे समक्रमांकित पत्र दिनांक २९/०९/२०१८ नुसार यापूर्वीच सूचना देण्यात आल्या असून त्यानुसार कार्यवाही करण्यात यावी.

उपरोक्त सूचनांचे पालन करण्याकरिता क्षेत्रीय अधिकाऱ्यांनी संबंधित वस्तू व सेवा कर अधिकाऱ्यांशी समन्वय साधून याबाबत दृढीकरण करून घ्यावे व अंमलबजावणीत काही अडचणी आल्यास त्यांचेही निराकरण करून घ्यावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१८१११३१५५०२९१४२७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vijendra
Prabhakar
Palwankar

Digitally signed by Vijendra Prabhakar Palwankar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra,
ou=Water Resources Department,
postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=7cb5ce90d018bdc109ad48f37ca4a3b06b0347375607bff9b7cc525c4c213e75,
serialNumber=1525bd95a04e2d242eaa74f8dbc215ca88aa7bfb907686a9a62b37f3a74e5eba,
cn=Vijendra Prabhakar Palwankar
Date: 2018.11.13 15:53:50 +05'30'

**(वि. प्र. पालवणकर)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**सहपत्र :-** वरीलप्रमाणे

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.मंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
४) मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
५) मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय, मुंबई
६) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
७) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
८) प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
९) सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१०) सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
११) महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर.
१२) सर्व कार्यकारी संचालक,पाटबंधारे विकास महामंडळे / सर्व महासंचालक
१३) सर्व मुख्य अभियंता.

१४) उप सचिव (मो.प्र-१/ मो.प्र-२/ जसं/ निवसं / सिंव्य /लाक्षेवि /लपा /जवि),यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

१५) आंतरवित्त सल्लागार व उपसचिव यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

१६) मोप्र-१ कार्यासन संग्रहार्थ.